


# लोकप्रशासन परिभाषा कोश

भाषा संचालनालय महाराष्ट्र शासन

# लोकप्रशासन उपसमिती

**अध्यक्ष**

डॉ. ना. र. इनामदार, पुणे विद्यापीठ, पुणे

**प्रतिनिधी-सदस्य**

डॉ. य. दि. फडके, मुंबई विद्यापीठ, मुंबई

डॉ. म. कृ. देशमुख, नागपूर विद्यापीठ, नागपूर

डॉ. अर्जुनराव दर्शनकरार, मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद

डॉ. वी. ए. काटीकर, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर

डॉ. शां. कृ. भोगले, मराठी विज्ञान परिषद, मुंबई

डॉ. श्री. गो. काशीकर, महाराष्ट्र शासन

श्रीमती रोहिणी गवाणकर, श्रीमती ना. दा. ठा. महिला विद्यापीठ, मुंबई

प्रा. व्ही. सी. फडके, मुंबई विद्यापीठ, मुंबई

**सदस्य-सचिव**

डॉ. न. व. पाटील, भापा उप संचालक, मुंबई

# प्रस्तावना

मातृभाषा हेच शिक्षणाचे माध्यम असावे हे आता सर्वमान्य झाले आहे. महाराष्ट्र राज्यात मराठीला राजभाषेचे स्थान मिळाल्यानंतर पदवी परीक्षेपर्यंतच्या शिक्षणाचे माध्यम मराठी असावे हा विचार दृढ झाला. माध्यमाचे हे परिवर्तन घडवून आणण्यात अर्थातच अडचणी होत्या. मुख्य म्हणजे शास्त्रीय व तांत्रिक विषयांसाठी आवश्यक असलेला पारिभाषिक शब्दसंग्रह हाताशी नव्हता. निरनिराळे विषय शिकवण्यासाठी आवश्यक असलेली पाठ्यपुस्तके व संदर्भ पुस्तके मराठीतून लिहिली गेली नव्हती. काही विद्यापीठांनी या दृष्टीने प्रयत्न केले होते. परंतु ते मर्यादित स्वरूपाचे व त्यांच्यापुरते होते. सर्व विद्यापीठांतून समान व एकरूप परिभाषा वापरली जावी यासाठी नव्याने प्रयत्न करणे आवश्यक होते.

या सर्व गोष्टींचा सांगोपांग विचार करण्यासाठी १९६७ साली महाराष्ट्रातील सर्व विद्यापीठांचे कुलगुरू व भाषा सल्लागार मंडळाचे सदस्य यांची संयुक्त बैठक घेण्यात आली. या बैठकीत भाषा संचालनालयाने सर्व विज्ञानविषयक व मानवविद्याविषयक विषयांची परिभाषा विद्यापीठांच्या सहकार्याने तयार करावी आणि संदर्भ ग्रंथांच्या व क्रमिक पुस्तकांच्या निर्मितीचे काम महाराष्ट्र राज्य विद्यापीठ ग्रंथ निर्मिती मंडळ व महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती मंडळ यांच्याकडे सोपवावे असे ठरले.

वरील निर्णयाच्या अनुरोधाने भाषा संचालनालयाने शास्त्रीय व मानविकी विद्याशाखांमधील काही मूलभूत विषयांच्या समित्या प्रथम स्थापन करून व काही निर्देशक तत्त्वे ठरवून परिभाषा निर्मितीच्या कामास सुरुवात केली. या समित्यांवर सर्व विद्यापीठांचे प्रतिनिधी आणि मराठी विज्ञान परिषदेचा प्रतिनिधी यांना सदस्य म्हणून नेमण्यात आले. परिभाषा तयार करताना, ही परिभाषा केवळ प्रादेशिक स्तरापुरतीच मर्यादित न राहता अन्य भारतीय भाषांनाही ती जवळची वाटेल याचे भान ठेवावे लागेल. त्यामुळे ही परिभाषा मराठी भाषेच्या प्रकृतीला बाधा न येता केंद्र सरकारने तयार केलेल्या परिभाषेशी शक्यतो मिळतीजुळती ठेवण्याचा प्रयत्न करण्यात आला.

आतापर्यंत भाषा संचालनालयाने गणित, रसायन, समाज, वाणिज्य, तर्कशास्त्र व तत्त्वज्ञान, ग्रंथालय, शारीर, भूशास्त्र, भौतिक, शिक्षण, यंत्र अभियांत्रिकी, स्थापत्य अभियांत्रिकी, विद्युत अभियांत्रिकी, कृषिशास्त्र, शरीरक्रियाशास्त्र, जीवशास्त्र व राज्यशास्त्र या विषयांचे परिभाषा कोश प्रसिद्ध केले आहेत. तसेच अर्थशास्त्र, धातुशास्त्र, भूगोल, भाषाशास्त्र, साहित्य समीक्षा, संख्याशास्त्र व गणितशास्त्र (सुधारित), रसायनशास्त्र (सुधारित), व्यवसाय व्यवस्थापन, मानसशास्त्र, विकृतिशास्त्र या विषयांच्या परिभाषेचे काम पूर्ण झाले असून तेही कोश यथावकाश प्रसिद्ध करण्यात येतील. प्रस्तुत ‘ लोकप्रशासन परिभाषा कोश ’ हा या प्रकल्पातील एक टप्पा आहे.

"लोकप्रशासन" विषयक परिभाषेची निर्मिती करण्यासाठी एप्रिल १९७९ मध्ये एक उप-समिती स्थापन करण्यात आली. या समितीच्या एकूण ३१ बैठकी घेण्यात आल्या व त्यात सुमारे ४,००० इंग्रजी पारिभाषिक संज्ञांचे मराठी पर्याय निश्चित करण्यात आले.

या कामी समितीने "Robbins" यांच्या "Administrative process" या ग्रंथाचा तसेच "R. J. S. Baker" आणि "Paul C. Partholomew" यांच्या अनुक्रमे "Administrative theory and public administration" व "An outline of public administration" या ग्रंथांचा, तसेच अन्य ग्रंथांचा आधार घेतला.

अनेक तज्ञ व मान्यवर व्यक्तींच्या सहकार्याने तयार झालेला हा कोश या क्षेत्रातील प्राध्यापक, लेखक व विद्यार्थी यांना तसेच, या विषयाची आस्था असणाऱ्या अन्य व्यक्तींना व सर्व संबंधित शास्त्रीय विभागांना उपयुक्त व मार्गदर्शक ठरेल असा विश्वास वाटतो.

**न. ब. पाटील,**
भाषा संचालक, महाराष्ट्र राज्य.

भाषा संचालनालय,
मुंबई ४०० ०३२.

# कोश परिचय

**कोशाची रचना पुढीलप्रमाणे आहे :—**

**इंग्रजी शब्द व शब्दानुक्रम.**—इंग्रजी शब्द देताना मुख्यत्वेकरून Chambers' Technical Dictionary व Webster's New International Dictionary यांचा, तसेच या विषयाशी संबंधित असलेल्या अन्य कोशांचा वर्णलेखन (spelling) इत्यादींसाठी आधार घेतला आहे.

**इंग्रजी शब्दजाती.**—प्रत्येक एकेरी संज्ञेपुढे तिची शब्दजाती दर्शविली आहे. (जसे :— n; adi.; v.t. & v.i. इ.) दोन किंवा अधिक इंग्रजी शब्द असलेल्या जोड संज्ञेपुढे शब्दजाती दर्शविलेली नाही.

**विषयनिर्देशक संक्षेप.**—एखादी इंग्रजी पारिभाषिक संज्ञा विशिष्ट पोटविषयाशी संबंधित असेल तर पर्याय देण्यापूर्वी तो विवक्षित विषय दर्शविणारा संक्षेप इंग्रजी इटॅलिक मुद्राक्षरात दिला आहे.

**पर्याय, अर्थच्छटा, स्पष्टीकरणे.**—इंग्रजी संज्ञेपुढे शब्दजाती, विषयनिर्देशक संक्षेप (असल्यास) दिल्यानंतर तिचे एक किंवा अधिक मराठी पर्याय दिलेले आहेत. पर्याय देताना वेगवेगळ्या अर्थच्छटा असल्यास त्यांना क्रमांक दिले आहेत. काही ठिकाणी अर्थ अधिक स्पष्ट व्हावा म्हणून पर्यायापूर्वी कंसात इंग्रजी स्पष्टीकरणे दिली आहेत. पर्यायांचा वापर यथार्थपणे व्हावा यासाठी आवश्यक तेथे कंसात "as in :" असे देऊन त्या पर्यायांचा वाक्यात उपयोग करून दाखविला आहे.

**मराठी शब्दजाती.**—इंग्रजी संज्ञेपुढे शब्दजाती दर्शविली असल्याने व त्यानुसार मराठी पर्याय घेतला असल्याने मराठी शब्दजाती वेगळी दर्शविली नाही.

**लिंगनिर्देश.**—(१) प्रत्येक मराठी एकेरी पर्यायापुढे, तो नाम असल्यास, लिंगनिर्देश केला आहे. (२) इंग्रजी संज्ञा एकेरी असल्यास तिच्या जोडशब्द असलेल्या मराठी पर्यायापुढे लिंगनिर्देश केला आहे.

**शब्दकुळे.**—शब्दकुळांतील शब्दांची आधारभूत कल्पना एकच असते, परंतु त्यातील शब्द सूक्ष्म अर्थच्छटा व्यक्त करून आपली भिन्नता दर्शवितात. असे शब्द त्यातल्या महत्त्वाच्या शब्दाखाली पर्यायानंतर cf. असे दर्शवून एकत्रितपणे दिले आहेत. तसेच त्या शब्दकुळातील शब्द, कोशात त्यांच्या वर्णक्रमानुसार योग्य त्या ठिकाणी दिले आहेत व तिथे cf. असे म्हणून ज्या इंग्रजी संज्ञेखाली हे कूळ आले आहे त्या इंग्रजी संज्ञेचा निर्देश केला आहे. उदा. पृष्ठ २ वरील acting हे कूळ पहावे. अशा तऱ्हेने शब्दकुळाखाली सर्व शब्द एकत्र आणण्याच्या या पद्धतीचा अभ्यासकांना उपयोग होऊ शकेल.

**जोडसंज्ञा.**—काही महत्त्वाच्या पारिभाषिक जोडसंज्ञांखाली या संज्ञांतील इतर महत्त्वाचे प्रकार दर्शविणाऱ्या संज्ञा आणल्या आहेत. उदा. पृष्ठ ९ वरील budget ही संज्ञा पहावी. याही पद्धतीचा अभ्यासकांना उपयोग होऊ शकेल.

दुसरे असे की, लोकप्रशासन या विषयाशी संबंधित काही मूळ फ्रेंच शब्द, या कोशात समाविष्ट करून त्याविषयीचे स्पष्टीकरण कंसात दिले आहे. उदा. पृष्ठ १४ वरील commission departmental ही संज्ञा पाहावी.

**समानार्थी शब्द.**—काही इंग्रजी शब्द जवळजवळ समानार्थी असल्याने त्यांना मराठी पर्याय देताना हे शब्द समानार्थी आहेत हे दर्शविण्यासाठी एकाच ठिकाणी दिले आहेत. ज्या शब्दांसमोर पर्याय दिला आहे त्या शब्दासमोर कंसात (also) असे देऊन दुसरा समानार्थी शब्द दर्शविला आहे व कंसातील शब्द त्याच्या वर्णक्रमानुसार ज्या ठिकाणी आला असेल त्या ठिकाणी त्या शब्दासमोर (=) अशी खूण दर्शवून पर्याय ज्या शब्दासमोर दिला आहे तो शब्द दर्शविला आहे. त्याचप्रमाणे इंग्रजी शब्दाच्या वर्णलेखनात (spelling) थोडाफार फरक असलेले इंग्रजी शब्दही वरील पद्धतीनेच दर्शविण्यात आले आहेत.

## भाषा सल्लागार मंडळाने वैज्ञानिक व तांत्रिक परिभाषेच्या निर्मितीसाठी आधारभूत म्हणून ठरवून दिलेली निदेशक तत्त्वे

१. शब्दसंग्रह व पर्याय.––हिंदी वैज्ञानिक व तांत्रिक परिभाषेची निर्मिती करताना, केंद्र सरकारने विज्ञान व तंत्र क्षेत्रात यापूर्वी झालेल्या कार्याचा आढावा घेतला होता आणि निरनिराळ्या राज्यांत याबाबत झालेल्या एकूण कार्यांचा समन्वय करण्याचे प्रयत्नही केले होते. मराठी परिभाषेची निर्मिती करताना देखील त्याच धोरणाचा अवलंब करून प्रत्येक विद्याशाखेतील शब्दांचे संकलन करणे अगत्याचे आहे. त्यासाठी प्रत्येक विद्याशाखेची केंद्र सरकारने तयार केलेली विज्ञान शब्दावली आधारभूत मानून, पुणे विद्यापीठ, माध्यमिक शिक्षण मंडळ आणि इतर विज्ञान संस्था यांच्या शब्दावलींचाही विचार करावा. तसेच माध्यमिक स्तरावरील वैज्ञानिक व तांत्रिक विषयांच्या पाठ्यपुस्तकातून पुष्कळशा तांत्रिक शब्दांचे जे पर्याय रूढ झाले आहेत, ते देखील विचारात घ्यावेत.

२. आंतरराष्ट्रीय संज्ञा.––"आंतरराष्ट्रीय संज्ञा" या शक्यतोवर त्यांच्या इंग्रजी स्वरूपातच ठेवाव्यात व त्यांचे मराठी भाषेत लिप्यंतरण करावे.

आंतरराष्ट्रीय संज्ञांत साधारणतः पुढील गोष्टींचा समावेश होतो :––

(अ) मूलद्रव्ये आणि संयुगे (महत्त्वपूर्ण पदे, उपपदे वगैरेंसह) यांची नावे; ही नावे लिप्यंतरित करून देताना नावापुढे त्यांची संकेतचिन्हेसुद्धा द्यावीत. जसे:––हायड्रोजन (H), कार्बन (C).

मात्र मूलद्रव्ये आणि संयुगे यांसाठी वापरण्यात येणारी संकेतचिन्हे व संक्षेप इंग्रजी लिपीत जशीच्या तशीच ठेवावीत. जसे :––किरणोत्सारी थोरिअमचा समस्थानीय 90th,$^{228}$, निकोटीन $C_{10}\ H_{14}\ N_2$

रासायनिक चिन्हांकित समीकरणे, त्यांची इंग्रजीतील संकेतचिन्हे जशीच्या तशी ठेवून, पुढीलप्रमाणे द्यावीत :––







गंधक, रुपे, तांबे, कथील, पारा, जस्त, शिसे इत्यादी रूढ शब्द वर्णनात तसेच राहावेत; परंतु संयुगामध्ये मात्र त्यांचा वापर करू नये.

(ब) वजने, मापे आणि परिणामे, जसे :––कॅलरी, ॲम्पीअर वगैरे.

(क) विशेषनामे व त्या नामांवरून घेतलेल्या संज्ञा मूळ भाषेतील त्यांच्या उच्चारानुरूप लिहाव्यात. जसे :—फॅरनहीट श्रेणी (फॅरनहीट), व्होल्टमीटर (व्होल्टा), अँपीअर (अँपीअर).

(ड) वनस्पतिशास्त्र, प्राणिशास्त्र, भूविज्ञान इत्यादींसारख्या शास्त्रीय विषयांमधील द्विपद नामसंज्ञा.

(इ) रेडिओ, पेट्रोल, रडार, इलेक्ट्रॉन, न्यूट्रॉन, प्रोटॉन यासारखे नवीन शब्द.

(फ) गणित व इतर शास्त्रांमध्ये वापरण्यात येणारे संख्यांक, संकेतचिन्हे, सूत्रे वगैरे जसे :— Sin, Cos, Tan, Log.

तथापि, वर निर्दिष्ट केलेल्या पारिभाषिक संज्ञांपैकी पुष्कळशा संज्ञांना मराठीत योग्य पर्याय असून ते शाळा व महाविद्यालये इत्यादींत कित्येक वर्षांपासून रूढ झाले आहेत. जसे :—ऑक्सिजन-प्राणवायु, कॅलरी-उष्मांक, Sin—ज्या, Cos—कोज्या वगैरे. तेव्हा आंतरराष्ट्रीय संज्ञा त्यांच्या इंग्रजी स्वरूपात जशाच्या तशा लिप्यंतरित करून देताना त्याबरोबरच त्या संज्ञांना मराठीत रूढ असलेले पर्याय देखील द्यावेत.

३. जी संकेतचिन्हे असतील ती त्यांच्या आंतरराष्ट्रीय स्वरूपातच राहू द्यावीत. तथापि, संज्ञांचे संक्षेप देवनागरी लिपीतून दर्शवावेत. म्हणजे सेंटिमीटर या संज्ञेचा संक्षेप सें.मी. असा देवनागरी लिपीत द्यावा.

४. वैज्ञानिक व तांत्रिक पारिभाषिक शब्दांसाठी पर्यायांची निश्चिती करताना, अर्थाची निश्चितता व सुबोधता यावर अधिक भर द्यावा व मराठी भाषेच्या प्रकृतीशी अविरोधी असे व शक्यतोवर भारतीय भाषांत वापरता येतील असेच पर्याय निवडावे.

५. विवक्षित वैज्ञानिक शब्दांसाठी जे देशीय पर्याय मराठी भाषेत प्रचलित आहेत ते आणि सर्वसाधारण वापरण्यात येणारे पर्याय राहू द्यावेत.

६. विदेशी भाषांमधील जे शब्द मराठी भाषेत प्रचलित आहेत ते तसेच ठेवावेत. जसे :— मशीन, इंजिन, मीटर, लिटर वगैरे.

७. हे पर्याय मराठी व्याकरणानुसार प्रातिपदिक रूपात द्यावेत.

८. मिश्र शब्दांची निर्मिती.—वैज्ञानिक परिभाषा तयार करताना Pasteurisation "पाश्चरीकरण", Voltage "व्होल्टता" अशांसारखे मिश्र-शब्द बनवणे हे भाषेच्या स्वाभाविक प्रवृत्तीस अनुसरून असल्यामुळे गरजेनुसार असे शब्द तयार करावेत.

९. जरूर तेथे समान अर्थी पारिभाषिक शब्दांची कुळे लक्षात घेऊन पारिभाषिक शब्द निश्चित करावेत.

अकरा

# संक्षेप सूची

| | | |
|---|---|---|
| *Acctt* | .. | Accounts |
| *adj.* | .. | Adjective |
| *adv.* | .. | Adverb |
| *Admn.* | .. | Administration |
| *cf.* | .. | compare |
| *Fin.* | .. | Finance |
| *Fr.* | .. | French |
| *Gram.* | .. | Grammar |
| *Intern. Law* | | International Law |
| *Mil.* | .. | Military |
| *n.* | .. | Noun |
| *Parl. Practice* | | Parliamentary Practice |
| *pl.* | .. | Plural |
| *sing.* | .. | Singular |
| *v.i.* | .. | Verb, intransitive |
| *v.t.* | .. | verb, transitive |
| *v.t. & i.* | .. | Verb, transitive and intransitive |

| | | |
|---|---|---|
| अ. क्रि. | .. | अकर्मक क्रियापद |
| अ. व. | .. | अनेकवचन |
| न. | .. | नपुंसकलिंग |
| पु. | .. | पुल्लिंग |
| सा. | .. | सामान्य लिंग |
| स्त्री. | .. | स्त्रीलिंग |

# लोकप्रशासन परिभाषा कोश

## A

**abdicate,** *v.t.* **पदत्याग करणे, सत्तात्याग करणे**

**abdication,** *n.* **१ सत्तात्याग (पु.), पदत्याग (पु.) २ त्यजन (न.)**

**aberration,** *n.* **१ मतिभ्रम (पु.) २ विपथन (न.)**

**ability,** *n.* (capacity to perform) **समर्थता (स्त्री.)**
*cf.* capability शक्यता
capacity सामर्थ्य
competence क्षमता
efficiency कार्यक्षमता
eligibility पात्रता
fitness योग्यता
qualification अर्हता

**ability standard, क्षमता मानक, समर्थता मानक**

**abolish,** *v.t.* **निरास करणे, नाहीसा करणे** *cf.* cancel

**abridge,** *v.t.* (as, rights) **१ अधिकार संक्षेपणे, अधिकारांचा संक्षेप करणे २ संक्षेप करणे, संक्षिप्त करणे**

**abrogate,** *v.t.* **निराकरण करणे** *cf.* cancel

**abscond,** *v.i.* **फरारी होणे**

**absence,** *n.* **१ अभाव (पु.) २ अनुपस्थिति (स्त्री.), गैरहजेरी (स्त्री.)**

**absenteeism,** *n.* **१ गैरहजेरी (स्त्री.), अनुपस्थिति (स्त्री.) २ अनुपस्थितीचे प्रमाण (न.), अनुपस्थिति प्रवृत्ति (स्त्री.), अन्यत्रवासी पद्धति (स्त्री.)**

**absentee landlord, १ अन्यत्रवासी जमीनमालक २ अन्यत्रवासी घरमालक**

**abstract,** *n.* **१ संक्षेप (पु.) २ गोषवारा (पु.) ३** (as, a return) **विवरण (न.)**
*v.t.* **१ संक्षिप्त करणे २ गोषवारा काढणे**
*adj.* १ (not concrete) **अमूर्त** २ (obstruse) **गूढ** ३ (as applied to sciences) **केवल, शुद्ध**

*a carte blanche, Fr.* (blank paper) **कोरे पत्र**

**acceptance theory of authority, प्राधिकाराचा स्वीकृति सिद्धांत**

**access,** *n.* **१ शिरकाव (पु.), पोच (स्त्री.) २ पहावयास मिळणे (न.) ३ प्रवेश (पु.) ४ वाट (स्त्री.) ५ उपागमन (न.)**

**accessible,** *adj.* **प्रवेश्य**

**Accession Council, १ राज्यारोहण परिषद २ सामिलीकरण परिषद**

**accident prone, अपघातप्रवण**

**accommodation,** *n.* **१ जागा (स्त्री.) २ सामावणी (स्त्री.) ३ सोय लावणे (न.)**

**account,** *n.* **१ खाते (न.) २ हकिगत (स्त्री.) ३ लेखा (पु.), हिशेब (पु.)**
**adjusting account समायोजन लेखा**
**appropriation account विनियोजन लेखा**
**audited account परीक्षित लेखा**
**capital and revenue account भांडवली व महसुली लेखा**
**commercial account वाणिज्यिक लेखा**
**departmental account विभागीय लेखा, विभागीय हिशेब**
*pro forma* **account प्रपत्र लेखा**
**public accounts लोकलेखा**
**subsidiary account दुय्यम लेखा**
**suspense account निलंबन लेखा**

**accountability,** *n.* १ स्पष्टीकरण योग्यता (स्त्री.) २ उत्तरदायित्व (न.) ३ जिम्मेदारी (स्त्री.)
**accountable,** *adj.* १ जबाबदार, जिम्मेदार २ स्पष्टीकरणयोग्य ३ उत्तरदायी
**accountant-*cum*-cashier,** लेखापाल-नि-रोखपाल
**Accountant General,** महालेखाकार (सा.), महालेखापाल (सा.)
**account head,** लेखाशीर्ष (न.)
**accounting,** *n.* लेखांकन (न.)
  **accrual accounting** उपार्जन लेखांकन
  **cash accounting** रोख लेखांकन
  **commercial type accounting** वाणिज्यसदृश लेखांकन
  **cost accounting** परिव्यय लेखांकन
**Accounting Officer,** लेखांकन अधिकारी
**accounting principles,** लेखांकन तत्त्वे
**accounts code,** लेखा संहिता
**Accounts Department,** लेखा विभाग
**accredit,** *v.t.* १ श्रेय देणे २ अधिस्वीकृती देणे ३ अधिकारपत्र देणे
**accrual accounting,** उपार्जन लेखांकन
**accusation,** *n.* आरोप (पु.), दोषारोपण (न.), आरोप करणे (न.)
**accused,** *n.* १ आरोपी (सा.) *cf.* criminal २ अभियुक्त (सा.)
**achievement,** *n.* १ संपादणूक (स्त्री.), संपादन (न.) *cf.* performance २ कामगिरी (स्त्री.) *cf.* performance
**achievement motivation,** कर्तृत्वसिद्धी प्रेरणा
**achievement orientation,** संपादन अभिमुखता, कर्तृत्वसिद्धी अभिमुखता
**acquiescent massess,** १ मूकसंमतीदर्शी जनता २ नाखुषीची मूकसंमती देणारी जनता
**acquired,** *adj.* १ अर्जित २ संपादित
**acquisitiveness,** *n.* परिग्रहशीलता (स्त्री.)
**acquit,** *v.t.* १ *Law* दोषमुक्त करणे २ ऋण चुकते करणे, कर्ज फेडणे ३ कामगिरी बजावणे
**acquittal,** *n.* दोषमुक्ति (स्त्री.)
**acquittance roll,** १ वेतनपट (पु.) २ पावती तक्ता (पु.)
**Act,** *n.* १ अधिनियम (पु.) २ कृति (स्त्री.) *cf.* performance
**acting,** *adj.* १ कार्यकारी २ *Admn.* हंगामी
  *cf.* in-charge प्रभारी
  officiating स्थानापन्न
  provisional तात्पुरता
  temporary अस्थायी
  working कार्यकारी
**action,** *n.* १ क्रिया (स्त्री.) २ कृति (स्त्री.) ३ कार्यवाही (स्त्री.) ४ कारवाई (स्त्री.) *cf.* performance
**action programme,** कृति कार्यक्रम
**action research,** कृति संशोधन
**active collaboration,** सक्रिय सहयोग
**active service,** १ युद्धसेवा (स्त्री.) २ क्रियाशील सेवा ३ सक्रिय सेवा
**activities,** *n. pl.* क्रियाकलाप (पु.)
**activity,** *n.* १ कार्य (न.) २ क्रियाशीलता (स्त्री.) ३ (in *pl.*) क्रियाकलाप (पु.)
**actuarial reserve plan retirement,** विमागणितीय राखीव योजना सेवानिवृत्ति
**actuarial retirement system,** विमागणितीय सेवानिवृत्ति पद्धति
**adaptation,** *n.* १ जुळवून घेणे (न.) २ रूपांतर (न.) ३ *Law* अनुकूलन (न.) ४ अनुयोजन (न.)
**adaptive function,** अनुयोजी कार्य
**adaptive model,** अनुयोजी प्रतिमान
**adaptive system,** अनुयोजी पद्धति
**addendum,** *n.* पूरकपत्र (न.)
**additional grant,** समधिक अनुदान
**adduce,** (evidence) *v.t.* १ (पुरावा) दाखल करणे २ प्रस्तुत करणे

adequacy, *n.* पर्याप्तता (स्त्री.)
*ad-hoc* grant, तदर्थ अनुदान
adjective law, पद्धतिनिष्ठ विधि
adjournment motion, स्थगन प्रस्ताव
adjudge, *v.t.* न्यायनिर्णीत करणे
adjudication hearing, अभिनिर्णय सुनावणी
adjusting account, समायोजन लेखा
administrative act, प्रशासकीय कृति
administrative action, १ प्रशासनिक कार्य २ प्रशासनिक कार्यवाही
administrative agency, प्रशासनिक अभिकरण, प्रशासनिक एजन्सी
administrative analysis, १ प्रशासनिक पृथक्करण २ प्रशासनिक विश्लेषण
administrative audit, प्रशासनिक लेखापरीक्षा
administrative behaviour, प्रशासनिक वर्तन, प्रशासकीय वर्तन
administrative challenge, १ प्रशासकीय आक्षेप २ प्रशासनातील आव्हान
administrative change, प्रशासनिक परिवर्तन, प्रशासनिक बदल
administrative class, प्रशासकीय वर्ग
administrative control, प्रशासकीय नियंत्रण, प्रशासनिक नियंत्रण
administrative co-ordination, प्रशासकीय समन्वय
administrative corruption, प्रशासनिक भ्रष्टाचार
administrative court, प्रशासनिक न्यायालय
administrative decision, प्रशासकीय निर्णय, प्रशासनिक निर्णय
administrative department, प्रशासनिक विभाग
administrative development, प्रशासनिक विकास
administrative directions, प्रशासनिक निदेश, प्रशासकीय निदेश
administrative effectiveness, प्रशासनिक परिणामकारकता
administrative efficiency, प्रशासकीय कार्यक्षमता, प्रशासनिक कार्यक्षमता
Administrative Enquiry Commission, प्रशासनिक चौकशी आयोग
Administrative Enquiry Committee, प्रशासनिक चौकशी समिती
administrative functionary, प्रशासकीय कार्यधारक
administrative functions, प्रशासन कार्य, प्रशासनिक कार्य
administrative hybrid, प्रशासनिक संकरित
administrative instruction, प्रशासनिक अनुदेश, प्रशासकीय अनुदेश
administrative integration, प्रशासनिक एकात्मीकरण
administrative integrity, प्रशासनिक नेकी, प्रशासनिक कसोटी
administrative justice, प्रशासनिक न्याय, प्रशासकीय न्याय
administrative law, प्रशासनिक विधि, प्रशासकीय विधि, प्रशासनिक कायदा, प्रशासकीय कायदा
administrative leadership, प्रशासनिक नेतृत्व, प्रशासकीय नेतृत्व
administrative machine = administrative machinery, प्रशासनिक यंत्रणा
administrative man, प्रशासनपरायण मानव
administrative manpower, प्रशासकीय मनुष्यबळ
administrative mechanism, प्रशासनिक कार्यतंत्र, प्रशासनिक यंत्रणा
administrative ministry, प्रशासनिक मंत्रालय
administrative models, प्रशासकीय प्रतिमान, प्रशासकीय नमुने
administrative objective, प्रशासकीय समुद्दिष्ट
administrative officer, प्रशासकीय अधिकारी

administrative organisation, प्रशासनिक संघटना, प्रशासनिक संघटन, प्रशासकीय संघटना, प्रशासकीय संघटन
administrative policy, प्रशासनिक धोरण
administrative process, १ प्रशासनिक प्रक्रिया २ प्रशासनिक कार्यपद्धति
Administrative Reform Movement, प्रशासकीय सुधारणा चळवळ
administrative reforms, प्रशासकीय सुधारणा
Administrative Reforms Commission, प्रशासन सुधार आयोग
administrative sector, प्रशासनिक क्षेत्र
administrative set-up, प्रशासनिक रचना
administrative skill, प्रशासनिक कौशल्य, प्रशासकीय कौशल्य
Administrative Staff College, प्रशासकीय अधिकारी महाविद्यालय
administrative state, प्रशासनिक राज्य
administrative structure, प्रशासनिक संरचना
administrative system, प्रशासनिक व्यवस्था, प्रशासन व्यवस्था
administrative theory, प्रशासकीय सिद्धांत, प्रशासन सिद्धांत
administrative tribunal, प्रशासन न्यायाधिकरण
administrator, *n.* प्रशासक (सा.)
admit, *v.t.* दाखल करून घेणे
admonish, *v.t.* १ कानउघाडणी करणे, समज देणे *cf.* chide २ उपदेश करणे
adulteration, *n.* भेसळ (स्त्री.)
*ad-valorem* tax, मूल्यानुसार कर
advance action, आगाऊ कृति
advanced management, प्रगत व्यवस्थापन, प्रगत प्रबंधन
advancement, *n.* अभिवृद्धि (स्त्री.)
Adversary Process, प्रतिपक्षी प्रक्रिया
advertisement tax, जाहिरात कर
advisory board = advisory body, सल्लागार मंडळ
advisory committee, सल्लागार समिति
advisory function, सल्लागारी कार्य
Advisory Planning Board, सल्लागार नियोजन मंडळ
advisory staff, सल्लागार सहायकवृंद
advocate, *v.t.* समर्थन करणे
*n. Law* अधिवक्ता (पु.), ॲडव्होकेट (पु.) *cf.* lawyer
affect, *n.* (emotional disposition to the system) भाववृत्ति (स्त्री.)
affidavit, *n. Law* शपथपत्र (न.), प्रतिज्ञालेख (पु.), ॲफिडेव्हिट (न.)
affray, *n.* दंगल (स्त्री.) *cf.* breeze
aftercare, *n.* अनुरक्षण (न.), नंतरची जपणूक (स्त्री.)
aftercare service, अनुरक्षण सेवा
agency, *n.* अभिकरण (न.), एजन्सी (स्त्री.)
aggravated assault, गंभीर हमला
aggregate pattern, सकल बंध
aggrieved individual, पीडित व्यक्ति
aggrieved party, पीडित पक्ष, पीडित व्यक्ति
agrarian society, शेतीप्रधान समाज (पु.), कृषिप्रधान समाज (पु.)
agreement, *n.* १ करार (पु.) २ संमतिपत्र (न.) ३ मेळ (पु.)
*cf.* compact ठराव
contract संविदा
covenant प्रसंविदा
engagement अभिसंकेत
indenture करारनामा
pact करार
agricultural price support policy, शेतमाल किंमत आधार धोरण
aim, *n.* साध्य (न.), ध्येय (न.) *cf.* goal
aims and objectives, साध्ये व समुद्दिष्टे
alcoholic, *n.* मद्यासक्त (सा.)
alcoholism, *n.* १ मद्यासक्ति (स्त्री.) २ मद्यरोग (पु.), मद्यव्याधि (स्त्री.)

Alderman, *n.* नगरश्रेष्ठी (पु.)
alien, *adj.* अन्यदेशीय
alienate, *v.t.* १ दूर करणे २ दुरावा निर्माण करणे ३ अन्यसंक्रामित करणे
alienation, *n.* १ दूरीकरण (न.) २ दूरीभाव (पु.), परात्मभाव (पु.)
allegation, *n.* १ *Law* अभिकथन (न.) २ आरोप (पु.)
alleged, *adj.* अभिकथित, कथित
alleged cause, अभिकथित कारण
allegiance, *n.* १ निष्ठा (स्त्री.) २ राजनिष्ठा (स्त्री.)
alliance, *n.* १ युति (स्त्री.) २ मैत्री (स्त्री.) ३ सख्यसंबंध (पु.), ऐक्यसंबंध (पु.), मित्रसंबंध (पु.)
*cf.* coalition संयुति, युति
fusion मिलाफ
league जूट
union एकजूट
All India Mayor's Council, अखिल भारतीय महापौर परिषद
All India Radio, आकाशवाणी (स्त्री.)
All India Services, अखिल भारतीय सेवा
allocation of appropriations, विनियोजनाच्या रकमांचे वाटप
allocation of work, कामाचे वाटप
allow the appeal, अपील मान्य करणे
all-purpose authority, सर्वहेतू प्राधिकरण, सर्वोद्देशी प्राधिकरण
almoner, *n.* १ दानाध्यक्ष (पु.) २ आमनर (पु.) (सध्याचा इंग्लंडमधील वैद्यकीय समाजसेवक)
alternative system of management, व्यवस्थापनाची पर्यायी पद्धति
ambivalence, *n.* द्विधावृत्ति (स्त्री.), द्विधाभाव (पु.)
amenable, *adj.* १ वळवता येण्याजोगा २ प्रभाव्य
amortise, *v.t.* कर्जफेडीची तरतूद करणे
analysis, *n.* विश्लेषण (न.)
analytical abstraction, विश्लेषणात्मक अमूर्तीकरण
analytical approach, १ विश्लेषक अभिगम २ विश्लेषक दृष्टिकोन
analytical construct, विश्लेषणात्मक रचनालेख
analytic estimating, पृथक्करणात्मक अंदाज करणे
ancillary, *adj.* अनुषंगी, आनुषंगिक
Anglo Indian, अँग्लोइंडियन (सा.)
annexure, *n.* जोडपत्र (न.)
annual letting value, वार्षिक भाडे मूल्य
annuity, *n.* वर्षासन (न.), वार्षिकी (स्त्री.)
annul, *v.t.* विलोपन करणे *cf.* cancel
anomise, *n.* १ अतिचार (पु.) २ प्रमाणकशून्यता (स्त्री.) ३ निष्प्रमाणकता (स्त्री.)
anticipated reaction, अपेक्षित प्रतिक्रिया
anti corruption bureau, भ्रष्टाचारविरोधी केंद्र, लाचलुचपतविरोधी केंद्र
antiquated, *adj.* जुनाट
anti-social, *adj.* समाजद्रोही, समाजविरोधी
anti-social element, १ समाजकंटक (पु.), समाजविरोधी घटक २ समाजद्रोही घटक ३ समाजविघातक घटक
apathetic partisan, उदासीन पक्षाभिनिवेशी
apocalyptic, *adj.* भविष्यकथनकारी
apolitical person, राजकीय बाबतीत उदासीन व्यक्ति
appeal, *v.t.* १ *Law* अपील करणे २ आवाहन करणे
*n.* *Law* अपील (न.)
appellant, *n.* *Law* अपीलकर्ता (पु.), अपीलकार (पु.)
appellate, *adj.* अपील, अपिलीय
appendix, *n.* परिशिष्ट (न.)

**application**, *n.* १ आवेदन (न.), अर्ज (पु.), आवेदनपत्र (न.) २ अनुप्रयोग (पु.), उपयोजन (न.), अनुप्रयुक्ति (स्त्री.) ३ प्रयुक्ति (स्त्री.) ४ तत्परता (स्त्री.)
**application form**, आवेदनपत्राचा नमुना, अर्जाचा नमुना
**application of law**, कायदा लागू करणे, कायदा लागू होणे, विधिप्रयुक्ति (स्त्री.)
**application of rule**, नियम लागू करणे, नियम लागू होणे
**apply**, *v.t. & i.* १ अर्ज करणे, आवेदनपत्र देणे २ (as, Acts) प्रयुक्त करणे, प्रयुक्त होणे, (as, rules) लागू करणे, लागू होणे ३ उपयोजन करणे
**appraisal**, *n.* मूल्यन (न.)
**apprehend**, *v.t. Law* १ ताब्यात घेणे, पकडणे २ धास्ती वाटणे
**apprehension**, *n.* १ आकलन (न.), ग्रहण (न.), बोध (पु.) २ धास्ती (स्त्री.) ३ *Law* ताब्यात घेणे (न.), पकडणे (न.)
**apprentice training**, शिकाऊ उमेदवाराचे प्रशिक्षण
**appropriation**, *n.* १ विनियोजन (न.) २ विनियोग (पु.)
**appropriation account**, विनियोजन लेखा
**Appropriation Act**, विनियोजन अधिनियम
**appropriation audit**, विनियोजन लेखापरीक्षा
**appropriation bill**, विनियोजन विधेयक
**appropriation committee**, विनियोजन समिति
**appropriation report**, विनियोजन अहवाल
**approval**, *n.* १ पसंती (स्त्री.) २ मान्यता (स्त्री.)
**approved list**, मान्य सूची
**approved procedure**, मान्य कार्यपद्धति
**aptitude**, *n.* १ अभियोग्यता (स्त्री.) २ अभिवृत्ति (स्त्री.)
**arbitrary**, *adj.* स्वेच्छानुसारी, मनमानी, लहरी
**arbitration**, *n.* १ लवाद (पु.) २ लवादनिर्णय (पु.)
**area**, *n.* क्षेत्र (न.)
**Area Development Programme**, क्षेत्रविकास कार्यक्रम
**armed**, *adj.* सशस्त्र
**armed revolution**, सशस्त्र क्रांति
**arraignment**, *n.* न्यायालयासमोर खेचणे (न.), न्यायालयासमोर उभे करणे (न.), न्यायालयीन समुत्थापन (न.), जाहीर दोषारोपण (न.)
**arrears**, *n.* १ थकबाकी (स्त्री.) २ थकित काम (न.)
**arrest**, *v.t.* १ *Law* अटक करणे २ अटकाव करणे,
*n.* अटक (स्त्री.), थोपवणूक (स्त्री.)
**arrestable**, *adj.* १ अटकयोग्य २ अटकावयोग्य
**arrestee**, *n.* बंदी (सा.)
**arrest procedure**, अटकेसंबंधीची कार्यपद्धति
**arrondissement**, *n.* अराँदिस्माँ (पु.) (१ फ्रान्समधील स्थानिक शासनाचा प्रशासनिक घटक २ फ्रान्समधील स्थानिक शासनाचे निर्वाचन क्षेत्र)
**ascription**, *n.* १ सिद्ध (न.) २ लादणूक (स्त्री.) ३ स्थितिदत्त (न.)
**ascriptive**, *adj.* १ स्थितिदत्त २ लादलेला
**ascriptive orientation**, स्थितिदत्त अभिमुखता
**ascriptive status**, १ स्थितिदत्त दर्जा २ लादलेला दर्जा
**asocial person**, सामाजिक बाबतीत उदासीन व्यक्ति
**aspiration**, *n.* आकांक्षा (स्त्री.)
**assault**, *v.t.* हमला करणे,
*n.* हमला (पु.)
**assembly**, *n.* १ सभा (स्त्री.) (as in : legislative assembly विधानसभा) २ *Law* जमाव (पु.) (as in : unlawful assembly बेकायदेशीर जमाव) ३ जुळणी (स्त्री.), जुळवणी (स्त्री.), जोडणी (स्त्री.)

**assembly line,** १ **जुळवणी साखळी** २ **जुळवणी यंत्रसमुच्चय, जुळवणी कार्ययंत्रणा**

**assent,** *v.i.* **अनुमती देणे**
*n.* **अनुमती** (स्त्री.)

**assessee,** *n.* १ **करपात्र व्यक्ति** (स्त्री.) २ **निर्धारिती** (सा.)

**assessment,** *n.* १ **आकारणी** (स्त्री.) २ **निर्धारण** (न.) ३ **निर्धारित कर** (पु.)

**assessment centre,** १ **मूल्यनिर्धारण केंद्र, निर्धारण केंद्र** २ **आकारणी केंद्र**

**assessment of performance, कामगिरीचे निर्धारण, कामगिरीचे मूल्यांकन**

**assessment of taxes,** १ **कर निर्धारण** २ **कर आकारणी**

**assessment of work, कामाचे निर्धारण, कामाचे मूल्यांकन**

**assessor,** *n.* १ **निर्धारक** (पु.) २ *Law* **न्यायसहायक** (पु.), **असेसर** (पु.)

**assign,** *v.t.* **अभिहस्तांकित करणे**

**assignee,** *n.* १ **सोपवणूक** (स्त्री.) २ **अभिहस्तांकन** (न.) ३ **अभिहस्तांकिती** (सा.)
*v.t.* **अभिहस्तांकित करणे**

**assignment,** *n.* १ **कामगिरी** (स्त्री.), **नेमून दिलेले काम** (न.) *cf.* performance २ **अभिहस्तांकन** (न.) ३ **सोपवणी** (स्त्री.), **सोपवलेले काम** (न.)

**assistance,** *n.* **साहाय्य** (न.)

**assistant,** *n.* **सहायक** (सा.)

**assistant mayor, सहायक महापौर**

**associate,** *n.* **सहयोगी** (सा.)
*v.t. & i.* १ **सहयोगी करणे, सहयोगी होणे** २ **संबंध जोडणे, संबंध असणे** ३ **बरोबर राहणे**

**association,** *n.* **संघ** (पु.), **संस्था** (स्त्री.)
*cf.* board मंडळ
body संस्था, निकाय
committee समिति
confederation (of unions) बृहत्संघ
corporation महामंडळ, निगम
federation (of unions) महासंघ
organisation संघटना
society संस्था, मंडळी
syndicate संहति
union संघ

**association of employees, कर्मचारी संघ**

**assumption,** *n.* १ **गृहीतक** (न.), **गृहीत** (न.) २ (as of charge, office, etc.) **ग्रहण** (न.)

**assumption of responsibility, जबाबदारी स्वीकारणे**

**assurances committee, आश्वासन समिति**

**attach,** *v.t. & i.* **जप्ती आणणे, टाच आणणे**
*cf.* confiscate अधिहरण करणे, सरकारजमा करणे
distrain (माल वगैरे) अटकावून ठेवणे
distress (कर, भाटक वगैरेच्या वसुलीसाठी मालावर) अटकावणी लावणे
forfeit १ समपहरण करणे २ गमावणे
seize अभिग्रहण करणे, जप्त करणे

**Attached Financial Adviser Scheme, संलग्न वित्तीय सल्लागार योजना**

**attached office, संलग्न कार्यालय**

**attachment,** *n.* १ **संलग्नता** (स्त्री.) २ **संबद्धता** (स्त्री.) ३ **टाच** (स्त्री.), **जप्ती** (स्त्री.)

**attainment,** *n.* १ **प्राप्त होणे** (न.) २ **नैपुण्य** (न.)

**attitude,** *n.* **अभिवृत्ति** (स्त्री.)

**attitudinal change, अभिवृत्तीय बदल, अभिवृत्तीय परिवर्तन**

**attribute listing, गुणविशेष सूचीकरण**

**attrition,** *n.* **झीज** (स्त्री.)

*audi alteram partem,* **दुसरी बाजूही ऐका**

**audio-visual aid, दृक्-श्राव्य साधन**

**audit,** *n.* **लेखापरीक्षा** (स्त्री.)

**Audit and Accounts Department, लेखापरीक्षा व लेखा विभाग**

audit and accounts order, लेखापरीक्षा व लेखा आदेश
Audit Board, लेखापरीक्षा मंडळ
Audit Code, लेखापरीक्षा संहिता
audit control, लेखापरीक्षा नियंत्रण
audited account, परीक्षित लेखा
audit report, लेखापरीक्षा अहवाल
authorisation, *n.* १ प्राधिकृत करणे (न.) २ प्राधिकारपत्र (न.)
authoritarian, *n.* १ प्राधिकारवादी (पु.) २ स्वामित्वप्रधान (पु.) ३ सत्तावादी (पु.)
authorities, *n. pl.* प्राधिकारीवर्ग (पु.अ.व.)
authority, *n.* १ प्राधिकारी (सा.) २ प्राधिकरण (न.) ३ प्राधिकारपत्र (न.) ४ प्राधिकार (पु.) ५ प्रामाण्य (न.), प्रमाण (न.)
authority and power, प्राधिकार आणि सत्ता
autocratic, *adj.* एकतंत्री, एकतंत्र–, एकतांत्रिक
autocratic democratic continuum, एकतांत्रिक ते लोकतांत्रिक सातत्यक
automation, *n.* स्वयंचलन (न.)
autonomous body, स्वायत्त संस्था
autonomy, *n.* स्वायत्तता (स्त्री.)
auxiliary, *adj.* १ सहाय्यकारी, सहायक २ पूरक
auxiliary agency, सहाय्यकारी अभिकरण, साधन सहायक अभिकरण
auxiliary organisation, सहाय्यकारी संघटना
auxiliary services, साधन सहायक सेवा
auxiliary staff, १ साधन सहायक २ पूरक सहायकवृंद
auxiliary staff functions, साधन सहायक कार्ये
auxiliary unit, १ साधन सहायक पथक २ साधन सहायक घटक
aversion, *n.* १ विमुखता (स्त्री.) २ तिटकारा (पु.) ३ सहजवैर (न.)
award damages, नुकसान भरपाई देववणे

# B

background training, पूर्वपीठिका प्रशिक्षण
Backward Class Commission, मागासवर्ग आयोग
bail, *n.* १ जमानतदार (पु.), जामीनदार (पु.) २ जमानत (स्त्री.), जामीन (पु.) *v.t.* जामिनावर सोडणे, जमानतीवर सोडणे
balanced budget, समतोल अर्थसंकल्प, संतुलित अर्थसंकल्प
balanced technology, संतुलित तंत्रशास्त्र
balancing, *n.* संतुलन (न.)
balance sheet, ताळेबंद (पु.)
ballot paper, मतपत्रिका (स्त्री.)
banish, *v.t.* हद्दपार करणे
*cf.* deport तडीपार करणे
exile देशपार करणे
expatriate स्वदेशनिष्कासित करणे
extradite– चे प्रत्यर्पण करणे
transport काळ्या पाण्यावर पाठवणे
bargain = bargaining, *n.* १ सौदा (पु.), सौदेबाजी (स्त्री.) २ व्यवहार (पु.) ३ किफायतशीर सौदा (पु.) *v.t.* सौदा करणे
bargaining agreement, सौदा करार
barrier, *n.* आडकाठी (स्त्री.)
bases of power, १ शक्तीचे आधार २ सत्तेचे आधार
basic training, मूलभूत प्रशिक्षण
battery, *n.* मारपीट (स्त्री.) *cf.* breeze
behaviour, *n.* वागणूक (स्त्री.), वर्तन (न.)
behavioural, *adj.* वागणूकविषयक
behaviouralism, *n.* वर्तनवाद (पु.)
behavioural movement, वर्तनवादी चळवळ
behavioural pattern, वर्तनबंध (पु.), वर्तनरीति (स्त्री.)
behavioural postulates of bureaucracy, नोकरशाहीची वर्तनविषयक आधारतत्त्वे

**behavioural scientist,** वर्तनवादी शास्त्रज्ञ
**behavioural system,** वर्तनवादी व्यवस्था
**belief system,** समजूत व्यवस्था
**bench,** *n.* न्यायपीठ (न.), खंडपीठ (न.)
**benefit,** *n.* १ लाभ (पु.), फायदा (पु.) २ हित (न.)
*v.t. & i.* लाभ करून देणे, लाभ होणे
**benevolence,** *n.* लोकहितेच्छा (स्त्री.), परहितेच्छा (स्त्री.), परोपकार (पु.)
**bequest,** *n.* १ (act of bequeathing) मृत्युपत्राने देणे (न.) २ (thing that is bequeathed) मृत्युपत्रित दान (न.)
**bereavement pay,** १ मृत आप्त वेतन २ वैधुर्य वेतन
**bias,** *n.* पूर्वग्रह (पु.)
**bidding procedure,** लिलावातील बोली बोलण्याची पद्धति
**binding order,** बंधनकारक आदेश
**biological analogy,** जीवशास्त्रीय सादृश्य दाखला
**black-list,** *n.* काळी यादी, वर्ज्य सूची
**black listing,** काळ्या यादीत नोंदणे
**block,** *n.* १ गट (पु.) २ खंड (पु.)
**Block Development Officer,** गट विकास अधिकारी
**block grant,** गट अनुदान, ठोक अनुदान, एकरकमी अनुदान
**bloodless revolution,** रक्तहीन क्रांति
**bloody revolution,** रक्तरंजित क्रांति
**blunder,** *n.* घोडचूक (स्त्री.) *cf.* mistake
**board,** *n.* मंडळ (न.) *cf.* association
**body,** *n.* संस्था (स्त्री.), निकाय (पु.) *cf.* association
*bonafide* **mistake,** सद्भावमूलक चूक *cf.* mistake
*Bona vacantia, Law* अस्वामिक मालमत्ता
**bonus,** *n.* अधिलाभांश (पु.), बोनस (पु.)
**borough,** *n.* बरो (पु.), नगरपरिषद (स्त्री.)
**borough status,** बरो दर्जा, नगरपरिषद दर्जा
**borrowing,** *n.* कर्ज (न.), उसनवारी (स्त्री.)
**boundary,** *n.* सीमा (स्त्री.)
**boundary charge,** सीमा शुल्क आकार
**bounded rationality,** सीमित बुद्धिनिष्ठता, सीमित तर्कसंगति
**brain-storming,** *n.* बुद्धिभंजन करणे (न.)
**branch,** *n.* शाखा (स्त्री.) *cf.* department
**breach,** *n.* १ *Law* भंग (पु.) २ खिंडार (न.)
*v.t.* भंग करणे, तोडणे
**breach of contract,** संविदा भंग (पु.)
**breach of duty,** कर्तव्यभंग (पु.)
**breakeven model,** लाभहानि संतुलन प्रतिमान, नफातोटा संतुलन प्रतिमान
**breeze,** *n.* झटापट (स्त्री.)
*cf.* affray दंगल
battery मारपीट
riot दंगा
scuffle झोंबाझोंबी
**bribary,** *n.* लाचलुचपत (स्त्री.) *cf.* corruption
**bribe,** *n.* लाच (स्त्री.) *cf.* corruption
**brutality,** *n.* पाशवीपणा (पु.), पशुता (स्त्री.)
**budget,** *n.* अर्थसंकल्प (पु.)
**balanced budget** समतोल अर्थसंकल्प, संतुलित अर्थसंकल्प
**capital budget** भांडवली अर्थसंकल्प
**deficit budget** तुटीचा अर्थसंकल्प
**revenue budget** महसुली अर्थसंकल्प
**revised budget** सुधारित अर्थसंकल्प
**surplus budget** शिलकी अर्थसंकल्प
**budget analyst,** अर्थसंकल्प विश्लेषक
**budget audit,** अर्थसंकल्पीय लेखापरीक्षा
**budget division,** अर्थसंकल्प विभाग
**budget estimate,** अर्थसंकल्पीय अंदाज
**Budget Estimates Committee,** अर्थसंकल्पीय अंदाज समिति

**budget grant**, अर्थसंकल्पीय अनुदान
**budgeting**, *n.* अर्थसंकल्पन (न.), अंदाजपत्रक करणे (न.)
**budgetory allotment**, अर्थसंकल्पीय वाटप
**building regulation**, बांधकाम विनियम
**burden of proof**, शाबितीची जबाबदारी, सिद्धिभार (पु.)
**bureau**, *n.* १ केंद्र (न.) *cf.* department २ विभाग (पु.) ३ मंडल (न.)
**bureaucracy**, *n.* १ नोकरशाही (स्त्री.) २ अधिकारी तंत्र (न.)
**bureaucrat**, *n.* १ नोकरशहा (पु.), २ अधिकारी (पु.)
**bureaucratic**, *adj.* अधिकारीवर्गीय
**bureaucratic commitment**, नोकरशाहीची बांधीलकी
**bureaucratic elite**, अधिकारीवर्गीय शिष्टजन, अधिकारीवर्गीय अभिजन
**bureaucratic infrastructure**, अधिकारीवर्गीय आधार संरचना
**bureaucratic model**, १ नोकरशाहीचे प्रतिमान २ अधिकारीवर्गविषयक प्रतिमान
**bureaucratic power**, १ नोकरशाही सत्ता २ अधिकारीवर्ग सत्ता
**bureaucratisation**, *n.* नोकरशाहीकरण (न.)
**bureau of budget**, (Office of Management) ब्यूरो ऑफ बजेट (ऑफिस ऑफ मॅनेजमेंट)
**bureau of publicenterprises**, सार्वजनिक उद्यम केंद्र, सार्वजनिक उद्योजन केंद्र
**bureaupathic**, *adj.* नोकरशाहीग्रस्त
**Business Advisory Committee**, कामकाज सल्लागार समिति
**business agent**, व्यवसाय अभिकर्ता
**business executive**, व्यवसाय कार्यकारी
**business interest**, धंदेविषयक हितसंबंध
**business organisation**, व्यापारी संघटना

# C

**cabinet**, *n.* कॅबिनेट (न.), मंत्रिमंडळ (न.)
**cabinet committee**, कॅबिनेट समिति, मंत्रिमंडळ समिति
**cabinet secretariat**, कॅबिनेट सचिवालय, मंत्रिमंडळ सचिवालय
**cadre**, *n.* संवर्ग (पु.), श्रेणी (स्त्री.)
**calling**, *n.* आजीविका (स्त्री.)
**cameralism**, *n.* कॅमेरलवाद (पु.)
**cameralist**, *n.* कॅमेरॅलिस्ट (पु.), कॅमेरल वादी (सा.)
**canalised**, *adj.* मार्गानुसारी
**cancel**, *v.t.* रद्द करणे
*cf.* abolish निरास करणे, नाहीसा करणे
abrogate निराकरण करणे
annul विलोपन करणे
declare null and void शून्य ठरवणे
invalidate विधिअग्राह्य ठरवणे
nullify शून्य करणे
override अधिभावी ठरणे, वरचढ होणे
overrule अधिशून्य करणे
quash रद्दबातल करणे
repeal निरसन करणे
rescind विखंडित करणे
revoke परत घेणे
set aside रद्द करणे
strike down रद्द करणे
vacate विलोपन करणे
**Cantonment Board**, कटक मंडळ, छावणी मंडळ
**capability**, *n.* शक्यता (स्त्री.) *cf.* ability
**capacity**, *n.* सामर्थ्य (न.) *cf.* ability
**capital account**, भांडवली लेखा (as in : on capital account भांडवली लेख्यांखाली)
**capital and revenue account**, भांडवली व महसुली लेखा
**capital budget**, भांडवली अर्थसंकल्प
**capital expenditure**, भांडवली खर्च

capital gain tax, भांडवली लाभ कर
capital transaction, भांडवली व्यवहार
*capitis diminutio*, प्रतिष्ठाहानि (स्त्री.)
career route, जीविका पथ
career service, जीवनवृत्ति सेवा
caretaker, *n.* काळजीवाहू (सा.)
carrier, *n.* १ जीवनौघ (पु.) २ प्रगतिपथ (पु.) ३ कर्तृत्व (न.)
carrier of innovating values, नवकारीमूल्य वाहक
cascade tax, (*also* value added tax) मूल्यनिर्मिति कर
case, *n.* १ प्रकरण (न.), बाब (स्त्री.) २ वाद (पु.)
case-diary, *n.* प्रकरण रोजनिशी (स्त्री.)
case law, निर्णय विधि
case material, १ वाद साहित्य २ प्रकरण साहित्य
case method, प्रकरण अभ्यास पद्धति
case-specification, *n.* प्रकरण विनिर्देश (पु.)
case studies, प्रकरण अभ्यास, व्यष्टिगत अभ्यास
case study approach, प्रकरण अभ्यास दृष्टिकोन
cash accounting, रोख लेखांकन
cash disbursement retirement plan, रोख बटवडा सेवानिवृत्ति योजना, रोख संवितरण सेवानिवृत्ति योजना
cashier, *n.* रोखपाल (सा.)
cash nexus, रोख अभिबंध
casual criminal, प्रासंगिक गुन्हेगार
catalyst, *n.* १ प्रक्रियाप्रेरक (सा.) २ उत्प्रेरक (सा.)
categorisation, *n.* १ प्रवर्गीकरण (न.) २ विल्हेवारी (स्त्री.)
category, *n.* १ प्रवर्ग (पु.) २ प्रकार (पु.)
cattle theft, गुरांची चोरी, पशुचौर्य (न.)
causative factor, कारक घटक
cause, *n.* १ कारण (न.), निमित्त (न.) २ पक्ष (पु.), बाजू (स्त्री.) ३ हेतु (पु.) ४ वाद (पु.)
cell, *n.* १ कोठडी (स्त्री.) २ सेल (पु.) *cf.* department ३ प्राथमिक घटक (पु.) ४ शाखा (स्त्री.)
censor, *n.* सेन्सॉर (सा.), अभ्यवेक्षक (सा.)
censorship, *n.* सेन्सॉरशिप (स्त्री.), अभ्यवेक्षण (न.)
censure, *n.* १ निंदाव्यंजन (न.) २ ठपका (पु.) *v.t.* १ निंदा करणे २ ठपका देणे *cf.* chide
censure motion, १ निंदाव्यंजक ठराव २ ठपका ठराव
census, *n.* खानेसुमारी (स्त्री.), जनगणना (स्त्री).
centered, *adj.* केंद्रित
centime, *n.* सेंटाईम (पु.) (फ्रेंच नाणे, फ्रँकचा एक शतांक)
central, *adj.* १ केंद्रीय २ मध्यवर्ती
Central Advisory Water Committee, केंद्रीय सल्लागार जल समिति
Central assistance to states, राज्यांना केंद्रीय सहाय्य
Central Economy Board, केंद्रीय अर्थव्यवस्था मंडळ
Central Economy Committee, केंद्रीय अर्थव्यवस्था समिति
central government, केंद्र सरकार, केंद्र शासन
centralisation, *n.* केंद्रीकरण (न.)
centralised, *adj.* केंद्रीभूत
centralised planning, केंद्रित नियोजन
centralised purchasing, केंद्रीकृत खरेदी
centralised unit, केंद्रित पथक, केंद्रित घटक
central-local relations, केंद्र-स्थानिक संबंध
central-local relationship, केंद्र-स्थानिक संबंध
central office, १ केंद्रीय कार्यालय २ मध्यवर्ती कार्यालय

**Central Public Works Department,** केंद्रीय सार्वजनिक बांधकाम विभाग
**central purchasing office,** १ केंद्रीय खरेदी कार्यालय २ मध्यवर्ती खरेदी कार्यालय
**Central Secretariat Training School,** केंद्रीय सचिवालय प्रशिक्षण शाळा
**Central Social Welfare Board,** केंद्रीय समाज कल्याण मंडळ
**central storage,** केंद्रीय साठवण
**Central Treasury Rules,** केंद्रीय कोषागार नियम
**centre,** *n.* केंद्र (न.), केंद्रबिंदु (पु.), मध्य (पु.)
**Centre-State relationship,** केंद्र-राज्य संबंध
**certification,** *n.* प्रमाणन (न.)
**certification of eligibility,** पात्रता प्रमाणपत्र देणे
**certification of personnel,** कर्मचारीवर्ग प्रमाणन
**certified plea,** १ प्रमाणित युक्तिवाद २ प्रमाणित प्रतिकथन
**certified school** = reformatory school = remand home
**certifying officer,** प्रमाणन अधिकारी
*certiorari, n.* प्राकर्षण (न.), सर्शिओराय (न.)
**cess,** *n.* उपकर (पु.) *cf.* duty
**cess on land,** भू-उपकर (पु.), जमिनीवरील उपकर
**chain of command,** आज्ञा शृंखला
**chairman,** *n.* १ सभापति (पु.) २ अध्यक्ष (पु.)
**challenging job,** आव्हानात्मक काम, आव्हानात्मक कामगिरी
**change agent,** परिवर्तन घटक
**change impact of the future,** भविष्याचा बदलकारी प्रभाव, भविष्याचा परिवर्तनकारी प्रभाव
**channel communication,** मार्ग संसूचन
**channels of communication,** संचरण मार्ग

**characteristic,** *n.* अभिलक्षण (न.), लक्षण (न.), वैशिष्ट्य (न.)
*adj.* विशिष्ट
**charged account,** भारित लेखा
**charged appropriation,** भारित विनियोजन
**charged expenditure,** भारित खर्च
**charged grant,** भारित अनुदान
**charges,** *n. pl.* १ खर्च (पु.) २ आकारणी (स्त्री.)
**charge-sheet,** *n.* *Law* दोषारोपपत्र (न.), आरोपपत्र (न.)
**charity,** *n.* १ धर्मादाय (पु.), दान (न.) २ औदार्य (न.)
**chartered corporation,** सनदी महामंडळ
**cheat,** *n.* ठक (सा.)
*v.t.* ठकवणे
**cheating,** *n.* ठकवणूक (स्त्री.)
**check,** *n.* नियंत्रण (न.)
external check बाह्य नियंत्रण
internal check अंतर्गत नियंत्रण
**check off system,** वेतन वजाती वर्गणी पद्धति
*chef de cabinet,* शेफ द काबिने (फ्रेंच मंत्रिमंडळाचा मुख्य सचिव)
**chemical analyser,** रासायनिक विश्लेषक
**chide,** *v.t.* रागे भरणे
*cf.* admonish कानउघाडणी करणे, समज देणे
censure १ निंदा करणे २ टपका देणे
rebuke फटकारणे, टाकून बोलणे
reprimand खरडपट्टी काढणे
reproach दूषण देणे, निर्भत्सना करणे
reprove हजेरी घेणे
**chief-executive,** *adj.* मुख्य कार्यकारी
**chief executive officer,** मुख्य कार्यकारी अधिकारी
**chief officer,** मुख्य अधिकारी
**circle,** *n.* १ मंडल (न.) २ वर्तुळ (न.), वृत्त (न.)
**circumstantial evidence,** परिस्थितिजन्य पुरावा

